केंद्र शासन पुरस्कृत योजनांतर्गत प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांच्या सनियंत्रणाकरीता समितीची स्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एमएलके -२०१५/प्र.क्र.५५ /पदुम ८**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : २४ एप्रिल, २०१५.**

**शासन निर्णय :**

केंद्र शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांतर्गत निधी वाटप करण्यात येतो. या योजनांमध्ये NPBBDD, राष्ट्रीय गोकूळ मिशन, राष्ट्रीय कृषि विकास योजना, नॅशनल लाईवस्टॉक मिशन, लाईवस्टॉक हेल्थ ॲण्ड डिसीज कंट्रोल, DEDS (Dairy Entrepreneurship Development Scheme), NDP-I इत्यादी योजनांचा समावेश आहे. या विविध योजनांमध्ये अनेक घटकांचा समावेश असून बहुतांश घटकांची द्विरुक्ती सदर योजनांमध्ये आहे.केंद्र शासनाच्या वरील योजनांचा लाभ घेताना एकाच घटकासाठी दोन वा त्यापेक्षा अधिक योजनांचा लाभ लाभार्थ्यांनी घेणे उचित नाही.

उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेता केंद्र शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या सनियंत्रणाकरीता सदर योजना राबविणाऱ्या संबंधित यंत्रणांच्या प्रतिनिधींची खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

१. सचिव (पदुम) - अध्यक्ष
२. आयुक्त, पशुसंवर्धन - सदस्य
३. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास - सदस्य
४. व्यवस्थापकीय संचालक, महानंद - सदस्य
५. राष्ट्रीय डेअरी विकास बोर्ड (NDDB) चे प्रतिनिधी - आमंत्रित सदस्य
६. उपआयुक्त (प्रक्रिया व वितरण) - सदस्य सचिव

उपरोक्त समितीने २ महिन्यांतून एकदा बैठक घ्यावी. सदर समिती राज्यातील शासन /मंडळे /विविध संघ व संस्थांकडून प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांचा केंद्र शासनाच्या योजनांच्या अनुषंगाने तपासणी करुन सनियंत्रण ठेवण्याचे कार्य करेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.Maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०४२४११२६३९०१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: CN = Shashank Madhav Sathe, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.24 11:38:01 +05'30'

**( श.मा.साठे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति ,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव

३. मा. राज्यमंत्री (दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव
४. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास ,महाराष्ट्र राज्य,वरळी, मुंबई १८.
५. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे १.
६. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., गोरेगाव (पू.) मुंबई ६५.
७. व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय डेअरी विकास बोर्ड, गोरेगाव (पू.) मुंबई ६५.
८. सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, महाराष्ट्र राज्य
९. सर्व जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१०. निवड नस्ती